**व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयात सर्वकंष ई-प्रशासन प्रणाली विकसित करण्यासाठी शासनाने मान्यता दिलेल्या RFP डॉक्युमेंटमध्ये बदल करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आयटीआय-२०१५/प्र.क्र. ६९/व्यशि-३,**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १७ जानेवारी, २०१७.

**पहा:**

१) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्रमांक : आयटीआय-२०१५/प्र.क्र. ६९/व्यशि-३, दिनांक : २२ मार्च, २०१६.
२) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, शासन शुद्धीपत्रक क्रमांक : आयटीआय-२०१५/प्र.क्र. ६९/व्यशि-३, दिनांक : २७ एप्रिल, २०१६.
३) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाचे पत्र क्रमांक : २२/डिव्हीईटी/ई-गव्हर्नन्स/२०१६/(७६)/४७, दिनांक १९.११.२०१६
४) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाचे पत्र क्रमांक : २२/डिव्हीईटी/ई-गव्हर्नन्स/२०१६/(७६)/४९, दिनांक ३०.११.२०१६

**प्रस्तावना :**

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयात सर्वकंष ई-प्रशासन प्रणाली निश्चित करणे तसेच त्यासाठी RFP (Request of Proposal) डॉक्युमेंटला संदर्भीय (१) येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच संदर्भाधिन (२) येथील पत्रान्वये RFP डॉक्युमेंटमधील काही मुद्यांमध्ये सुधारणा करण्यात आलेली आहे. सदर प्रणाली लागू करण्यासंदर्भात संचालनालयाने केलेल्या ई-निविदा पद्धतीने निविदेबाबतच्या केलेल्या कार्यवाहीमध्ये निविदादारांनी सादर केलेले दर शासन निर्णयातील अंदाजित किंमतीपेक्षा जास्त सादर केल्याने सदर दर अमान्य करुन निविदा प्रक्रीया रद्द करण्याचा निर्णय राज्यस्तरीय खरेदी समितीने घेतला आहे. औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमधील सत्र २०१७-२०१८ मधील ऑनलाईन प्रवेश प्रक्रीया साधारणपणे मे महिन्यापासून सुरु होत असल्याने तसेच ई-गव्हर्नन्स प्रकल्पाची व्याप्ती व कालावधी विचारात घेता नोव्हेंबर-डिसेंबर २०१६ मध्ये निविदा प्रक्रीया सुरु करणे आवश्यक असून निविदा प्रक्रीयेमध्ये निवड झालेल्या विकासकाला पुढील कार्यवाही करणेकरीता जानेवारी २०१७ पासूनचा पुढील कालावधी मिळू शकतो व अधिक अचुक ई-प्रशासन प्रणाली स्थापन करण्यात मदत होऊ शकेल, असे नमूद करुन संचालनालयाने संदर्भाधिन (३) व (४) येथील पत्रान्वये RFP डॉक्युमेंटमधील ४.४ Best Value Bid Evaluation मध्ये कही बदल करण्याचे प्रस्तावित केले आहे. संचालनालयाने केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने सदर बदलास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयात सर्वकंष ई-प्रशासन प्रणाली निश्चित करणे तसेच त्यासाठी RFP (Request of Proposal) डॉक्युमेंटला संदर्भीय (१) येथील शासन निर्णयान्वये

प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच संदर्भाधिन (२) येथील पत्रान्वये RFP डॉक्युमेंटमधील काही मुद्यांमध्ये सुधारणा करण्यात आलेली आहे. संचालनालयाने प्रस्तावित केल्याप्रमाणे संदर्भाधिन (१) येथील शासन निर्णयामधील ४.४ Best Value Bid Evaluation मध्ये पुढीलप्रमाणे बदल करण्यास तसेच सदर बदलानुसार निविदा प्रक्रीया सुरु करण्यास विविध अटीस अधिन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | दिनांक २२.०३.२०१६ च्या शासन निर्णयातील RFP (Request for proposal ) मधील मुळ तपशिल | RFP (Request for proposal ) मध्ये बदल करावयाचा किंवा वाढविण्यात आलेला तपशिल | बदल केलेल्या किंवा वाढविण्यात आलेल्या तपशिलाबाबतची कारणे |
|---|---|---|---|
| 4.4.5 | The bid with maximum composite score shall be declared best value bid and the Bidder whose total composite score (Weighted average of the technical and commercial score) is the maximum shall be declared selected bidder and shall be eligible for the award of Contract. | The bid with maximum composite score shall be declared best value bid and the Bidder whose total composite score (Weighted average of the technical and commercial score) is the maximum shall be declared selected bidder and shall be eligible for the award of Contract provided the value of the contract for Component-I and Component-II is within the limit of the estimated price of Rs. 445 Lakh for one time and Rs. 55 Lakh annual recurring. | To limit the quotes within estimated price. |
| 4.4.6 | ---- | If the Best Bid Value jointly is more than the total estimated cost of Rs. 500 lakh for Component-I and Component-II then the Purchaser reserves the right to award the contract component wise or sub-component wise. | To split up the project to limit the project cost within estimated price. |
| 4.4.7 | ---- | In case of failure of award of contract for integrated system which comprises Component-I, Component-II and Component-III, the purchaser reserves the right to evaluate and award the contract separately for sub-component of Component-III and if done so the bidder will have to integrate, transfer and post the data on portal of purchaser and also share and integrate the data with apex bodies of State and Central Government. | To facilate award of project components wise. |

अटी:-

१) दिनांक २२.०३.२०१६ च्या शासन निर्णयातील सर्व अटी जशाच्या तशा लागू राहतील. तसेच यासंदर्भातील सर्व प्रक्रीया पारदर्शक व निकषांनुसार होईल, याची संपूर्ण जबाबदारी संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांची राहील.

२) शासनाने दिनांक २२.०३.२०१६ च्या शासन निर्णयान्वये रुपये ५००.०० लक्ष अंदाजित खर्चास प्रशासकीय मान्यता दिलेली असल्याने नवीन निविदा प्रक्रियेमध्ये सदर खर्च रुपये ५००.०० लक्षापेक्षा अधिक असल्यास सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २३.०९.२०११ च्या शासन निर्णयातील परिच्छेद १२.७ नुसार सर्व निविदा उच्चाधिकार समितीने तपासून

मंजूर करणे आवश्यक आहे. त्यानुसार उच्चाधिकार समितीच्या मान्यतेसाठी सविस्तर प्रस्ताव संचालनालयाकडून शासनास सादर करण्यात येईल.

३) शासनाची पूर्व मान्यता घेतल्याशिवाय निविदादारास पुरवठा आदेश देण्यात येणार नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०११७१७०४४०९९०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vivek Madhav Patil

Digitally signed by Vivek Madhav Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0363f5e4d45eb33c0938f1f8861984f0e8a091632e6750ca13da0bc6a5549fad, serialNumber=841bf2ba2d65f151b54b8b93f504695966d17aeec76b11455a90a9edb7b50ff1, cn=Vivek Madhav Patil
Date: 2017.01.18 18:13:28 +05'30'

**( विवेक मा. पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव (माहिती तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय, मुंबई.
४) मा. मंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.राज्यमंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) संचालक (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण),व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, म.रा., मुंबई.
७) प्रधानसचिव, कौशल्य विकास व उद्योजकता यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८) उप सचिव (व्यशि), कौशल्य विकास व उद्योजकता यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण परीक्षा मंडळ, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
१०) सर्व सह संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण प्रादेशिक कार्यालय (संचालनालयामार्फत)
११) सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी (संचालनालयामार्फत)
१२) सर्व संबंधित प्राचार्य, शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था (संचालनालयामार्फत)
१३) सर्व संबंधित प्राचार्य, खाजगी औद्योगिक प्रशिक्षण केंद्र (संचालनालयामार्फत)
१४) सर्व संबंधित मुख्याध्यापक, शासकीय तांत्रिक विद्यालय (संचालनालयामार्फत)
१५) सर्व संबंधित मुख्याध्यापक, अशासकीय अनुदानित तांत्रिक विद्यालय (संचालनालयामार्फत)
१६) सर्व संबंधित मुख्याध्यापक, अशासकीय विनाअनुदानित तांत्रिक विद्यालय (संचालनालयामार्फत)
१७) कक्ष अधिकारी, (व्यशि-४/रोस्वरो-२) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) निवड नस्ती (व्यशि-३), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.